डांबरीकरण करणे व तद्नुषंगिक मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१४/प्र.क्र.०६/रस्ते-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ११ नोव्हेंबर, २०१६

**विषय:** भारतीय रस्ते महासभा व भुतल परिवहन मंत्रालययाने प्रकाशित केलेल्या १३ व्या सुधारीत पुस्तीकेमधील सुचनांप्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील रस्त्यांच्या डांबरीकरणातील कामांच्या विनिर्देशामध्ये व कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करणे. डांबरीकरणाच्या कामांसाठी स्काडा प्रणाली वापरण्या संदर्भातील सुधारीत मागदर्शक सुचना निर्गमित करण्याबाबत.

**संदर्भ:** १) शासन परिपत्रक क्र.एमआयएस-१०७८/प्र.क्र.३३९/डेस्क-४,दि.१७ जानेवारी,१९७९.
२) शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२००७/प्र.क्र.२५७/रस्ते-१, दि. २१ जानेवारी २००८.
३) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२००९/प्र.क्र.११६/रस्ते-१,दि.०४/१२/२००९.
४) शासन परिपत्रक क्रं. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.०६/रस्ते-१, दि.२६/०५/२०१४.
५) शासन परिपत्रक क्रं. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.०६/रस्ते-१, दि.०७/०८/२०१४.

उपरोक्त विषया संदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील रस्त्यांची कामे करतांना भारतीय रस्ते महासभेने निर्गमित केलेल्या अद्यायावत मार्गदर्शक सुचना प्रमाणे कार्यवाही करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या निर्णयास अनुसरून सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत दि. २६/५/२०१४ व दि. ७/८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे सा. बां. विभागाच्या अखत्यारीतील रस्त्यांच्या कामासाठी बॅच मिक्स प्लॅन्ट व स्काडा प्रणाली वापरण्या संदर्भात सविस्तर मागदर्शक सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सद्यस्थितीत या सुचना प्रमाणे रस्त्यांची कामे करण्यात येत आहेत.

दि. १८/१०/२०१६ रोजी सचिव (रस्ते) यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या सर्व मुख्य अभियंता यांच्या आढावा बैठकीमध्ये स्काडा प्रणाली संदर्भात शासनाने निर्गमित केलेल्या दि. ७/८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयात पुढील प्रमाणे उल्लेख असल्याचे मुख्य अभियंता यांनी निदर्शनास आणले आहे.

" यापुढे रस्त्यांच्या डांबरीकरणाची कामे करीत असतांना वर नमुद केलेल्या सुधारीत मागदर्शक सुचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. दि. १ जुन २०१६ नंतर बॅच मिक्स प्लॅन्टच्या उपलब्धतेचा विचार करुन पुढील आदेश यशावकाश निर्गमित करण्यात येतील. "

या उल्लेखामुळे दि. १ जुन २०१६ नंतर शासनाने निर्गमित केलेल्या स्काडा प्रणाली व बॅच मिक्स प्लॅन्ट वापरण्या संदर्भातील दि. २६/५/२०१४ व दि. ७/८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदी लागु आहेत का या संदर्भात क्षेत्रिय अधिका-यांमध्ये संभ्रमाचे वातावरण निर्माण झाले असून शासना मार्फत या संदर्भाने स्पष्ट सुचना निर्गमित करण्यात याव्या अशी विंनती करण्यात आली आहे.

या संदर्भाने शासन आता पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण निर्गमित करीत आहे. दि. १ जुन २०१६ नंतर शासनाने कोणत्याही सुचना निर्गमित केल्या नसल्याने दि. २६/५/२०१४ व दि.७/८/२०१४ रोजीच्या शासन परिपत्रकातील सर्व बाबी अमंलात आहेत. त्यामुळे या संदर्भात कोणताही संभ्रम निर्माण होऊ नये अशी शासनाची धारणा आहे. सद्यस्थितीत राज्यातील सर्व जिल्हयामध्ये कामासाठी शासनाने निर्गमित केलेल्या दि. २६/५/२०१४ व दि. ७/८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदी प्रमाणे रस्त्यांची कामे करण्यासाठी आवश्यक यंत्रसामुग्री व पुरेसे ठेकेदार उपलब्ध आहेत अशी धारणा आहे. या संदर्भाने शासनाकडे कोणतीही निवेदने प्राप्त झालेली नाहीत. त्यामुळे या दोन्ही शासन निर्णयातील सर्व तरतुदी यापुढे शासनामार्फत कोणताही बदल करेपर्यंत सर्व कामांसाठी लागू राहतील असे स्पष्ट करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१६१११११३२४७५८१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

C V Bhatkhande

Digitally signed by C V Bhatkhande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0b1e69c845ea0d8097d6c6057154f411ad937502168fce2f0ac043de142e0826, cn=C V Bhatkhande
Date: 2016.11.11 11:38:05 +05'30'

**( चं. वि. भातखंडे )**
**कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
२. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
३. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद विभाग
४. सर्व तांत्रिक अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.